**स्थायीकरण**

**विभागीय वन अधिकारी, गट- अ या संवर्गात डिसेंबर २०१४ ते जुलै २०१६ पर्यंत रिक्त झालेल्या कायम पदावर.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्रमांक:- एमएफएस २०१५/प्र.क्र.११९/फ-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक:- १ जून, २०१७

वाचा : - (१) शासन आदेश, महसूल व वन विभाग क्र एमएफएस १५२०००/प्र.क्र.१४०/फ-८, दि.२५/६/२००४
(२) शासन शुध्दीपत्रक, महसूल व वन विभाग क्र एमएफएस १५२०००/प्र.क्र.१४०/फ-८, दि.२९/१०/२००४
(३) शासन आदेश, महसूल व वन विभाग क्र एमएफएस १५२०००/प्र.क्र.१४०/फ-८, दि.१९/४/२०१२.
(४) शासन आदेश, महसूल व वन विभाग क्र एमएफएस २०१३/प्र.क्र.२०२/फ-८, दि.८/१/२०१४.
(५) शासन आदेश, महसूल व वन विभाग क्र एमएफएस २०१५/प्र.क्र.११९/फ-८, दि.२६/६/२०१५
(६) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर यांचे पत्र क्र. मवसे/स्थायीकरण/प्रक्र४६/ १२-१३/६१० / कक्ष-९, दि.३०/०५/२०१७.

**आदेश :-**

तत्कालिन महाराष्ट्र वनसेवा वर्ग-२ व दि.१.१.१९९० पासून महाराष्ट्र वनसेवा वर्ग-१ (कनिष्ठ श्रेणी) मधील सहायक वनसंरक्षक संवर्गातील शासन आदेश, दि.२५/६/२००४ अन्वये ५४, दि.२९/१०/२००४ अन्वये १, दि.१९/१०/२००६ अन्वये १, दि.२९/११/२००८ अन्वये १ व दि.१९/४/२०१२ अन्वये १, दि.०८/०१/२०१४ अन्वये २९ दि.२६/६/२०१५ अन्वये १२ अशा एकूण ९९ अधिकाऱ्यांचे सहा. वनसंरक्षक पदावरील स्थायीकरण करण्यात आलेले आहे.

२. सहायक वनसंरक्षक, गट-अ (कनिष्ठ श्रेणी) या संवर्गात डिसेंबर २०१४ ते जून-२०१६ पर्यंत रिक्त झालेल्या कायम पदावर, खालील सहायक वनसंरक्षकांना त्यांचे नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्रमांक ३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या कारणामुळे रिक्त झालेल्या कायम पदावर स्थायी करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | विभागीय वन अधिकारी यांचे नाव | कायम रिक्त पद उपलब्ध झाल्याचा दिनांक | कायम रिक्त पद उपलब्ध होण्याची कारणे |
|---|---|---|---|
| १ | श्री.पी.एस.पवार | २८/२/२००५ | श्री.ए.आर.भारती यांचे सेवानिवृत्तीमुळे |
| २ | श्री.बी.व्ही.जगझाप | २०/१२/२०१५ | श्री.पी.जे.लोणकर यांचे भावसे संवर्गात स्थायीकरणामुळे |

**३.** उपरोक्त अधिका-यांचे स्थायीकरण हे त्या अधिका-यांविरुध्दच्या विभागीय चौकशीतील निर्णयाच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

**४.** प्रस्तुत स्थायीकरण हे शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. एमएफएस-१५०१/२५६० /प्र.क्र.१८२ /फ-८, दि.२३/०८/२०१२ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या दिनांक १/१/१९९७ ते ३१/१२/१९९८ या कालावधीच्या सहाय्यक वनसंरक्षकांच्या अंतिम सामायिक ज्येष्ठतासूचीनुसार करण्यात आले आहे. सदर ज्येष्ठतासूची महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन ठेवून तयार करण्यात आल्यामुळे प्रस्तुत स्थायीकरणही महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या अंतिम मान्यतेच्या अधीन राहील. तसेच महाराष्ट्र प्रशासकिय न्यायाधिकरणात अथवा सर्वोच्च न्यायालयात ज्येष्ठतेबरोबर प्रलंबित असलेल्या मुळ अर्ज, दिवाणी अर्ज / अपिल/ इ. याचिकेतील निर्णयामुळे ज्येष्ठतासूचीत बदल झाल्यास त्याच्याही वरील स्थायीकरण अधीन राहील. पुढे असेही स्पष्ट करण्यात येत आहे की, वरील कारणामुळे सहाय्यक वनसंरक्षकांच्या ज्येष्ठतासूचीत बदल करावा लागल्यास व त्या अनुषंगाने स्थायीकरणाच्या दिनांकात बदल तसेच अस्थायीकरण करावे लागल्यास त्याबाबत सुधारणा करण्याचे सर्व अधिकार शासनाकडे राहतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६०११८३३१३०२१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Virendra R Tiwari

Digitally signed by Virendra R Tiwari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a95e1a9759002ee190cd79464daaba7dc840ec375cd62a646a64986631086810, cn=Virendra R Tiwari
Date: 2017.06.01 18:35:00 +05'30'

**(वीरेंद्र तिवारी)**
मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)

<u>प्रति :-</u>

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
४. महालेखापाल (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) १/२ महाराष्ट्र मुंबई/नागपूर
५. सामान्य प्रशासन विभाग (का-१२), मंत्रालय, मुंबई.
६. संबंधित अधिकारी (प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा. नागपूर यांचे मार्फत)
७. अ.स. /फ-७, कार्यासन महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती (फ-८ कार्यासन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.